
ई साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे,अंक :१८
दिनांक : २४.०५.२०१०
नेटाक्षरी
गुरूदेव
या अंकात आस्वाद घ्या..
बंगाली मिठाईचा..
खास महाराष्ट्रीयन थाळीत..
संपादक -
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
सहसंपादक -
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )
हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# संपादकीय

रवींद्रनाथ टागोर उर्फ 'गुरुदेव' हे ब्राम्हो पंथीय कवी,संगीतकार,नाटककार,कादंबरीकार व चित्रकार होते.१९ व्या शतकाच्या उत्तरार्धात व २० व्या शतकाच्या आरंभी त्यांनी केलेल्या कार्यामुळे बंगाली साहित्य व संगीतात आमुलाग्र बदल घडून आला.ते भारताचे व आशियाचे पहिले नोबेल विजेते आहेत.म्हणूनच ७ मे ह्या त्यांच्या जन्मदिनाचं औचित्य साधून नेटाक्षरी हा विशेषांक घेऊन आलाय.ह्यांत आहे,रवींद्रनाथ टागोरांच्या काही मूळ बंगाली कवितांचा स्वप्ना कोल्हे ह्यांनी केलेला मराठी भावानुवाद आणि सोबतच गुरुदेवांचे काही प्रसिध्द इंग्रजी Quotes.

बंगाली साहित्याची रवींद्रपूर्व व रवींद्रोत्तर अशी विभागणी करण्यात येते,यावरुनच बंगाली साहित्यावरील त्यांचा प्रभाव लक्षात येतो.कोलकात्याच्या पिराली ब्राम्हण कुटूंबात जन्मलेल्या रवींद्रनाथांनी वयाच्या ८ व्या वर्षी पहिली कविता लिहली.मग,वयाच्या १६ व्या वर्षी त्यांनी भानुसिंह ह्या टोपणनावाने कविता लिहल्या.१८७७ साली प्रकाशित झालेल्या रचनांमुळे ते प्रथम लोकांसमोर आले.१९ व्या शतकाच्या सुरुवातीस त्यांच्या नैवेद्य,खेया ह्या रचना प्रकाशित झाल्या.याच काळात त्यांचे साहित्य बंगाली व विदेशी वाचकांचे अधिकाधिक लक्ष खेचू लागले होते.त्यांनी कवितांचा free verse ह्या नावाने अनुवाद करणेही सुरु केले होते.१४ नोव्हेंबर १९१३ रोजी त्यांना स्वीडीश अकादमीचा नोबेल पुरस्कार 'गीतांजली' काव्यसंग्रहासाठी मिळाला.

यथावकाश संगीत,साहित्य,तत्वज्ञान,चित्रकला,नृत्य,शिक्षण अशा बहुविध क्षेत्रात रवींद्रनाथांनी संचार सुरु केला.संख्या व दर्जा या दोन्ही कसोट्यांवर त्यांची निर्मिती सरस ठरली.त्यांच्या बहुमुखी निर्मितीत कविता जरी प्रमुख असली तरी त्यांनी कादंबरी,निबंध,लघुकथा,प्रवासवर्णने,नाटके अशा बहुविध साहित्याची निर्मिती केली.यमकमुक्तता,आशावाद व गेयता ही त्यांच्या कृतींची प्रमुख वैशिष्ट्ये.आपल्या नाट्य,कविता यांद्वारे त्यांनी भारतातील जातीयतेविरुध्द जागृती निर्माण करण्याचा प्रयत्न केला.

रवींद्रनाथांचे महाराष्ट्राशी एक सुंदर नाते जुळलेले होते.कारवार येथील सृष्टीसौंदर्यामुळे त्यांना आपल्या पहिल्या नाटकाची प्रेरणा मिळाली.छत्रपती शिवाजी महाराजांचे जीवन त्यांच्यासाठी प्रेरणास्थान होते.शिवाजी महाराजांवर त्यांनी एक खंडकाव्यही रचले आहे.त्यांनी संत तुकारामांच्या साहित्याचा अभ्यास करुन त्यांचे काही अभंग बंगाली भाषेत अनुवादित केले आहेत.रवींद्रनाथांच्या व्यक्तिमत्वाने महाराष्ट्रीय साहित्यिक देखील प्रभावित झाले होते.रवींद्रसाहित्य मूळ बंगालीतून वाचण्याच्या इच्छेने प्रसिध्द मराठी लेखक,नाटककार पु.ल.देशपांडेंनी बंगाली भाषा शिकली.मराठी व कानडी भाषेत लेखन केलेले व कानडी भाषेतील आधुनिक साहित्यातील सर्वश्रेष्ठ कवी व जन्माने महाराष्ट्रीय असलेल्या द.रा.बेंद्रे यांच्या साहित्यावरही रवींद्रनाथांचा प्रभाव आहे.

वयाच्या ६० व्या वर्षी रवींद्रनाथांनी चित्र काढण्यास सुरुवात केली.त्यांच्या चित्रांची युरोपभर अनेक प्रदर्शने झाली.खरं तर तेव्हा त्यांना रंगांधळेपणाचा त्रास सुरु झाला होता.पण तरीही ते उत्साहाने चित्रं काढीत राहिले.सौंदर्यदृष्टी व रंगछटांमध्ये त्यांच्या चित्रशैलीची स्वतःची वैशिष्टये आहेत.स्वतःची हस्तलिखितेही ते अनेकदा कलाकारीने सजवत असत.

रवींद्रनाथांनी रचलेल्या व चाल दिलेल्या जवळपास २२३० गीतांना एकत्रितपणे रवींद्रसंगीत म्हणतात.भारत व बांगलादेश यांची राष्ट्रगीते असलेल्या अनुक्रमे 'जन गण मन' व 'आमार शोनार बांगला' ह्या रचना मूलतः रवींद्रसंगीताच हिस्सा आहेत.दोन राष्ट्रगीतांचे जनकत्व असलेले रवींद्रनाथ हे पृथ्वीवरील एकमेव कवी आहेत.त्यांनी रचलेली 'एकला चलो रे' व 'चित्त जेथा भयशून्य' ह्या २ कविता भारतीय स्वातंत्र्य संग्रामात प्रेरणागीते म्हणून गायल्या गेल्या आहेत.रवींद्रसंगीत हे अनेक अभिजात भारतीय संगीताच्या गायकवादकांचे प्रेरणास्त्रोत ठरले.ह्या संगीताने प्रभावित गायक-वादकात विलायत खान(सतार),अमजद अली खान(सरोद) ह्यांचा समावेश आहे.

१९०१ साली रवींद्रनाथ शांतिनिकेतन येथे राहण्यास आले.तेथे त्यांनी आश्रम उभारला.हाच पुढे शांतिनिकेतन आश्रम म्हणून प्रसिध्द झाला.त्या आश्रमात एक प्रार्थनागृह,प्रयोगशील शाळा,बागबगिचा व ग्रंथालय स्थापन केले गेले.आंधळया क्रांतीपेक्षा सावकाश होणाऱ्या शैक्षणिक क्रांतीवर त्यांचा जास्त विश्वास होता.स्वयंसहायता व सर्वसामान्यांचा बौध्दिक उध्दार ह्यांवर त्यांचा जास्त भर होता.सामाजिक अनारोग्य त्यांना मोठा शत्रू वाटत असे.

त्यांच्या अखेरच्या काळात म्हणजे १९३७-४१ मध्ये त्यांनी विज्ञानात रस घेतला होता.यातूनच त्यांच्या विश्वपरिचय या निबंधसंग्रहाची निर्मिती झाली.जीवशास्त्र,भौतिकी,खगोलशास्त्राच्या त्यांनी केलेल्या अभ्यासाचा प्रभाव त्यांच्या कवितांवरही जाणवतो.त्यांच्या कवितांतून झळकणारा निसर्गवास हा त्यांच्या वैज्ञानिक नियमांप्रती असलेला आदर अधोरेखित करतो.त्यांचे मृत्युविषयक चिंतन त्यांच्या शेवटच्या काळातील रचनांत प्रकटते.

रवींद्रनाथांचा प्रभाव दाखवणारे अनेक समारंभ जगभरात होत असतात.बंगालमध्ये तर त्यांच्या पुण्यतिथीस मोठा उत्सव होतोच पण अमेरिकेतील इलिनॉय येथेही त्यांच्या स्मृतीप्रित्यर्थ वार्षिकोत्सव होतो.जगभरातील अनेक भाषांत त्यांचे साहित्य अनुवादित झालेले आहे.प्रसिध्द चित्रपट दिग्दर्शक सत्यजित रे,चित्रकार नंदलाल बोस,अमर्त्य सेन,सलमान रश्दी,ऍन्द्रे गिडेल,यसुनारी कावाबाता,पाब्लो नेरुदा आदी नोबेल विजेतेदेखील त्यांच्यामुळे प्रभावित झालेले आहेत.

रवींद्रनाथ टागोरांचा साहित्यप्रवास कवीजनांना प्रेरणादायी ठरावा व वाचकांनाही त्यांच्या बंगाली कवितांचा आस्वाद घेता यावा म्हणून त्यांच्या निवडक कवितांची भावानुवादरुपी बंगाली मिठाई खास महाराष्ट्रीयन थाळीत घेऊन आलो आहोत.

- स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
संपादक

## – रवींद्रनाथ टागोरांची साहित्य सूची –

### – कादंबरी –
चोखेर बाली,गोरा,चतुरंग,राजा और रानी,मुक्तधारा,राज ऋषि,घरे बाईरे,शेषेर कबिता,जोगाजोग,चार अध्याय

### – लघुकथा –
काबुलीवाला,क्षिदित पाषाण

### – नृत्य नाटिका –
राजा और रानी,बिसर्जना,बैकुण्ठेर खाता

### – काव्य व पुस्तके –
सोनार तारी,नैवद्य,गीतांजली,पुरवी,पुनश्च,शेष सप्तक,पत्रपूत,श्यामली,जन्मदिने

# - गुरुदेवांच्या काही बंगाली कवितांचा मराठी भावानुवाद -



## ....चुंबन....

ही भाषा आहे ओठांची
ओठांच्या कानांसाठी

जणू..
दोघंजण..एकमेकांचं ह्रदय प्राशणारे
दोन उनाड प्रेमीक..घर सोडलेले

ओठांच्या संगमी दोन यात्री

जणू..
प्रेम सिद्धांतानुसार
दोन ओठांवर आदळून लोपण्यास
उचंबळलेल्या दोन लाटा

देहाच्या सीमेवर
एकमेकांसाठी आतुर दोन इच्छांचे मिलन

जणू प्रेमच लिहतंय सुरेख अक्षरांत एक प्रेमगीत

जणू,सुंदर चुंबनाक्षरांची ओठांवर अस्तरं

एका माळेत गुंफण्यासाठी
ओठांच्या दोन जोड्यांवरुन फुलांचं खुडणं

ओठांचे हे मधुमिलन म्हणजे
स्मितहास्याच्या जोडीची
लालचुटूक मधुचंद्र शैय्याच..



*Love is an endless mystery, for it has nothing else to explain it - Rabindranath Tagore*

# ....दुष्ट पोस्टमन....

आई , का गं एवढी शांत बसली आहेस ?
खिडकीतून आत येणारा पाऊस तुला भिजवतोय
आणि तुला त्याचं काहीच नाही ?
घड्याळाचे ४ वाजेचे टोल पडलेले तू ऐकलेस का ?
दादाची शाळेतून येण्याची वेळ झाली..
काय झालंय तुला ? तू इतकी वेगळी का दिसते आहेस ?
आज तुला बाबांचं पत्र नाही का आलं ?
मी पाहिलं पोस्टमनला
गावातल्या बहुतेक प्रत्येकासाठी त्याच्या पिशवीत पत्रं होती
तो फक्त बाबांची पत्रं स्वतःजवळ वाचण्यासाठी ठेवतो
दुष्टंच आहे तो....मला खात्रीच आहे
पण आई तू अजिबात निराश होऊ नकोस
उद्या शेजारच्या गावात बाजारचा दिवस आहे
तिथून तू कामवालीला काही पेन आणि कागदं विकत घेऊन यायला सांग
मी स्वतः बाबांची सारी पत्रं लिहून काढीन
त्यात तुला एक सुध्दा चूक सापडायची नाही
मी अगदी अ ते ज्ञ पर्यंत सारी अक्षरं लिहीन
आता तुला हसायला काय झालं आई ?
मी अगदी बाबांइतकच चांगलं लिहू शकेन अशी तुला खात्री नाहीये का ?
मी व्यवस्थित कागद आखून घेईन आणि सारी अक्षरं मोठी आणि सुंदर काढीन
आणि तुला असं वाटतं का,की
माझं पत्र लिहून झाल्यावर ती
त्या दुष्ट पोस्टमनकडे देण्याइतका मी मूर्ख असेन ?बाबांसारखा ?
वेळ न दवडता मी ते पत्रं तुझ्याकडे घेऊन येईल आणि
माझं पत्रातलं एकेक अक्षर वाचायला तुला मदत करेन
मला माहितीय
त्या पोस्टमनला तुला अशी सुंदर पत्रं वाचायला देणं अजिबात आवडत नाही
दुष्टंच आहे तो....मला खात्रीच आहे

# ....स्वप्नांच्या अंधुक वाटेवर....

गतजन्मी जी 'माझी' होती
तिला शोधायला
मी स्वप्नांच्या अंधुक वाटेवर निघालो

एका निर्जन रस्त्यावरच्या कोपऱ्यावर तिचे घर होते
कातरवेळेचा वारा वाहत होता
तिचा पाळीव मोर डुलकी काढत होता
अन कबुतरं एका कोपऱ्यात शांत बसली होती

दारात दिवा घेऊन ती माझ्यासमोर उभी ठाकली
आपल्या टपोऱ्या डोळ्यांनी माझा चेहरा न्याहाळत ती म्हणाली,

दोस्ता,ठीक आहेस ना ?

मी उत्तर देण्याचा प्रयत्न केला
कधीकाळी ज्या भाषेत आम्ही एकमेकांशी संवाद साधायचो ती विस्मृतीत गेलेली होती
खुप विचार करुनही मला आमची नावं आठवेनात

डबडबलेल्या डोळ्यांनी तिने उजवा हात माझ्या पुढे केला
तिचा हात हातात घेऊन मी शांत उभा राहिलो

आणि,

कातरवेळच्या वाऱ्यात दिवा फडफडत विझून गेला..
विझून गेला..

*Love is the only reality and it is not a mere sentiment. It is the ultimate truth that lies at the heart of creation - Gurudev*

# ....मैना आणि पोपट....



पिंजऱ्यात होती मैना आणि जंगलात होता पोपट
वेळेने पंख पसरले अन ते भेटले

विधीलिखीतच होतं....

भावुक होत पोपट म्हणाला,चल उडून रानात जाऊ
मैना कुजबुजली,आत ये,दोघं पिंजऱ्यात राहू
पोपट म्हटला,अगं पण पिंजऱ्यात पंख पसरायला जागा कुठे ?
मैना म्हणाली,अरे पण तरंगत्या आकाशात बसायचं तरी कुठे ?
पोपट म्हटला,बरं चल रानगीत गाऊ
मैना म्हणाली,जवळ बस,भाषा शिकू
पोपट म्हणाला,गाणं कधी शिकवता येत नाही
मैना म्हणाली, मला तर एकही रानगीत माहीत नाही
दिवसेंदिवस प्रेम त्यांचं उत्कट होत होतं
तरी जोडीनं उडणं त्यांना शक्य नव्हतं
गजांआडून एकमेकांना बघायचे
मिलनाची निष्फळ इच्छा करायचे

पंख फडफडत ते गायचे..जिवलगा,जवळ ये, जवळ ये..

अखेर एके दिवशी..

पोपट म्हटला निराशेने,पिंजऱ्याच्या बंद दाराची वाटे भीती,कसा येऊ ?
मैना म्हणाली खिन्नतेने,पंख माझे मृत,नाही त्यात शक्ती,कशी येऊ ?

विधीलिखीतच होतं....



*Love does not claim possession, but gives freedom - Rabindranath Tagore*

# ....नेहमीच्या रस्त्याने....

रोज नेहमीच्या रस्त्याने..
बाजारात मी फळं विकायला नेतो
गुरांना कुरणात नेतो
होडीने पैलतीरी जातो
आणि हे सारे रस्ते माझे ओळखीचे

अशाच एके सकाळी सामानामुळे माझी पिशवी जड झाली होती
लोकं शेतात कामं करीत होती
कुरणं गुरांनी भरलेली होती
पिकलेल्या भातशेतीमुळे धरती आनंदाने डुलत होती

अचानक वावटळ उठली
आकाश डोक्याला टेकू झाले
पहाटेच्या धुक्यातून बाहेर यावे तशी मनाला टवटवी आली

नेहमीचा रस्ता मी विसरलो
आडवाटेला शिरलो
नेहमीचं जग माझ्यासाठी अनोळखी झालं
जसं मी एक अबोध कळी बनलो होतो
मोठ्यांच्या जगाला दुरावलो होतो

मी पऱ्यांच्या जगात पोहचलो
त्या सकाळी..
मी नेहमीचा रस्ता हरवलो हे जणू माझं सुदैवच ठरलं
कारण..मला चक्कं माझं बालपण सापडलं होतं
बालपण सापडलं होतं

*Age considers; youth ventures - Rabindranath Tagore*

# ....तुझे प्रश्नार्थक डोळे....

प्रिये , तुझे प्रश्नार्थक डोळे दुःखी आहेत
चंद्र जसा सागरास जाणतो तसेच तुझे डोळे मला जाणतात
माझं संपूर्ण आयुष्य मी तुझ्या डोळ्यांसमोर उलगडून ठेवलंय
काहीही न लपवता आणि हातचं काहीही न राखता
म्हणूनच....तू मला ओळखतेस

जर ते हिरा असतं तर
मी ते शंभर तुकड्यांत तोडून
एका माळेत गुंफून तुला गळयात घालण्यासाठी दिलं असतं

जर ते सुगंधी फुल असतं तर
मी ते खुडून तुझ्या केसांत माळलं असतं

पण ते ह्रदय आहे,माझ्या प्रिये
त्याला ना किनारा ना तळ
जरी ह्या राज्याच्या सीमा तुला ठाऊक नाहीत
तरी तू ह्याची राणी आहेस

जर हा फक्त एक सुखाचा क्षण असता तर तू तो पाहू शकली असतीस
आणि क्षणार्धात वाचूही शकली असतीस
जर ह्या फक्त वेदना असत्या तर त्या अश्रूंत विरघळून
एका शब्दातही न सांगितलेलं गुपित बनून परावर्तित झाल्या असत्या

पण हे ‘प्रेम’आहे , माझ्या लाडके
जसं प्रेमातलं सुख आणि वेदना अनंत
तसंच मागण्या आणि संपत्ती देखील..
प्रेम आपल्या श्वासांच्या इतकं जवळ असतं जसं आपलं जीवन
तरीही,प्रेम म्हणजे काय ?
हे आपण कधीच पूर्णपणे समजू शकत नाही....कधीच नाही....

*We live in the world when we love it - Rabindranath Tagore*



## ....स्त्री....

हे स्त्री
तू असशी कलाकृती
पुरुषांचीही
नसे फक्त देवांची

अनंत कालापासून
बहाल केले तुज त्यांनी सौंदर्य अपुल्या ह्रदयातील
विणती तुजसाठी कवी कल्पनांचे सुवर्णजाल
रेखाटती चित्रकार तव चित्र देऊनी नूतन अमरत्व

सागर देई मोती,खाण देई सोने, वसंत देई सुमने
सजवण्या,परिधान करण्या,बनवण्या अधिक अनमोल
कुर्बान करती अपुल्या तमाम इच्छा तव यौवनावर

म्हणून असशी तू
अर्ध नारी अन अर्ध स्वप्न

हे स्त्री
तू असशी कलाकृती
पुरुषांचीही
नसे फक्त देवांची

*What is Art? It is the response of man's creative soul to the call of the Real - Rabindranath Tagore*

# ....साशंक....

प्रिये,
जेव्हा मी तुझा निरोप घ्यायला येतो
तुझ्या डोळयांत एक साशंक असं स्मित उमटतं
तुझा निरोप घेऊन मी इतक्या वेळेस परतलेलो असतो की
ह्यावेळेस देखील मी लवकरच परतेन असं तुला वाटतं

पण तुला खरं सांगायचं म्हणजे,ह्यावेळेस मी देखील साशंक आहे

> वसंत नित्यनेमाने येतो
> पौर्णिमा मावळते अन पुन्हा उगवते
> वर्षानुवर्ष फांद्यांवर फुलं लाजून उमलत राहतात
> आणि,
> तुझ्याजवळ पुन्हा परतण्यासाठीच
> मी देखील नेहमी तुझा निरोप घेत असतो

पण,
ह्यावेळेस घाई करु नको..जरा शांतपणे कल्पना कर,
जेव्हा मी म्हणतो,मी तुला नेहमीसाठी सोडून चाललोय
हे सत्य स्वीकार....

> एका क्षणासाठी का होईना तुझ्या डोळयांतल्या अश्रूंच्या झऱ्याने
> डोळयांखालची काळी वर्तुळं अधिक गडद होऊ देत
> आणि....

जेव्हा मी परत येईन तेव्हा मात्रं
निःशंकतेने खळखळून हास
खळखळून हास

*Faith is the bird that feels the light when the dawn is still dark - Rabindranath Tagore*



# ....निडर....

जिथे असेल मन निडर अन मान उंच
जिथे असेल ज्ञान सर्वांसाठी उपलब्ध

जग विभाजित नसेल जिथे अंर्तगत संकुचित भिंतींनी
शब्दं जन्मंतील जिथे सत्याच्या गर्भातूनी
ध्येयप्रेरित बाहू झेपावतील जिथे अचूकतेसाठी

चुकणार नाही जिथे नितळ प्रेरणेचा प्रवाह
मृत सवयींच्या वाळवंटात

होईल विकास जिथे मनाचा
सातत्याने
विस्तारणाऱ्या विचार अन कृतीत

स्वातंत्र्याच्या अशा त्या स्वर्गात,
हे जगत पित्या
माझ्या देशास जाग येऊ देत

माझ्या देशास जाग येऊ देत

*We gain freedom when we have paid the full price - Rabindranath Tagore*

# ....तू चालत रहा....

एकटा का असेना तू चालत रहा
संगे कुणी येवो न येवो तू चालत रहा
तू चालत रहा

जर कुणी बोललं नाही तुझ्याशी
पाठ फिरवली सर्वांनी
घाबरुन सगळे बसले घरात
चल,तूच मनातलं बोलून टाक
एकटा का असेना तू चालत रहा
संगे कुणी येवो न येवो तू चालत रहा
तू चालत रहा

जर आले सारे माघारी,निघाले बिचकत तुझ्यापाठी
दाट अरण्यात नसेल सोबती कुणी
सांडू दे जमिनीवर रक्त तुझं,न खाता हाय
चल,तूच काट्यांच्या मैदानात ठेव पाय
एकटा का असेना तू चालत रहा
संगे कुणी येवो न येवो तू चालत रहा
तू चालत रहा

नसेल दिवा,दाटला अंधार
आले वादळ,भरले आभाळ
ध्येयदीप असेल निराश
चल,तूच जाळ छाती कर प्रकाश
एकटा का असेना तू चालत रहा
संगे कुणी येवो न येवो तू चालत रहा
तू चालत रहा

*You can't cross the sea merely by standing and staring at the water - Rabindranath Tagore*

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा
ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात
मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक
सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त
वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.'
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु
असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची
लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या
सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा
आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –
स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप , ई शाळा
आणि
प्रसिध्द झालेली ई बुक्स –
टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती,
प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com